मोटार सायकल, स्कूटर, मोपेड, सायकल व अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी स्वयंचलीत किंवा मनुष्य बळाने चालणारी तीन चाकी सायकल खरेदीसाठी शासकीय कर्मचाऱ्यांना मंजूर करावयाच्या अग्रिमाबाबत.

# महाराष्ट्र शासन

वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांकः अग्रिम-२०१३/प्र.क्र.१०/२०१३/ विनियम

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

तारीखः २० ऑगस्ट, २०१४.

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग,क्र. अग्रिम-२०१०/प्र.क्र.१६/१०/विनियम, दि.१० जून, २०१०.

**प्रस्तावना -**

शासन अधिसूचना वित्त विभाग, क्रमांक: वेपुर-१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दि.२२ एप्रिल, २००९ अन्वये राज्य शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतनश्रेणी दिनांक १ जानेवारी, २००६ पासून सुधारित करण्यात आल्या आहेत. या सुधारित वेतन संरचनेतील वेतन बँड मधील वेतन विचारात घेऊन(ग्रेड-पे वगळून) संदर्भाधीन शासन निर्णय, दि.१० जून, २०१० अन्वये कर्मचाऱ्यांना दुचाकी वाहन/अपंग कर्मचाऱ्यांकरीता तीन चाकी सायकल खरेदी करण्यासाठी अग्रिम मंजूरीकरीता वेतन मर्यादा सुधारीत करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयान्वये सध्या मिळत असलेल्या सदर अग्रीमाच्या रकमेत वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

नवीन मोटार सायकल/स्कूटर/ मोपेड/सायकल व अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी तीन चाकी स्वयंचलीत सायकल किंवा मनुष्य बळाने चालणारी तीन चाकी सायकल खरेदीसाठी शासकीय कर्मचाऱ्यांना मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३६, १३७ व १३९ च्या अधीन आणि तसेच खाली नमूद केलेल्या अटींच्या अधीन सुधारित वेतन मर्यादेनुसार पुढील प्रमाणे सुधारित अग्रिम अनुज्ञेय राहील.

(अ) नवीन मोटार सायकल, अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी स्वयंचलीत किंवा मनुष्य बळाने चालणारी तीन चाकी सायकल खरेदीसाठी अग्रिम :-

१) ज्या कर्मचाऱ्यांचे वेतन बँड मधील मासिक वेतन ₹८,५६०/-(ग्रेड वेतन वगळून) किंवा अधिक आहे अशा कर्मचाऱ्यांना या प्रयोजनासाठी अग्रिम अनुज्ञेय राहील.

२) वेतन-बँड मधील मासिक वेतनाच्या ९ पट एवढी रक्कम किंवा ₹७०,०००/- किंवा मोटार-सायकलची प्रत्यक्ष किंमत यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढा अग्रिम अनुज्ञेय राहील.

३) अग्रिमाची वसूली व्याजासह ६० समान मासिक हप्त्यांमध्ये करण्यात यावी. प्रथम अग्रिम व नंतर व्याज वसूल करण्यात यावे.

(ब) नवीन स्कूटर खरेदी करण्यासाठी अग्रिमः-

१) ज्या कर्मचाऱ्यांचे वेतन-बँड मधील मासिक वेतन ₹८,५६०/-(ग्रेड वेतन वगळून) किंवा अधिक आहे अशा कर्मचाऱ्यांना या प्रयोजनासाठी अग्रिम अनुज्ञेय राहील.

२) वेतन-बँड मधील मासिक वेतनाच्या ८ पट एवढी रक्कम किंवा ₹६०,०००/- किंवा स्कूटरची प्रत्यक्ष किंमत यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढा अग्रिम अनुज्ञेय राहील.

३) अग्रिमाची वसूली व्याजासह ४८ समान मासिक हप्त्यांमध्ये करण्यात यावी. प्रथम अग्रिम व नंतर व्याज वसूल करण्यात यावे.

(क) नवीन मोपेड खरेदी करण्यासाठी अग्रिम :-

१) ज्या कर्मचाऱ्यांचे वेतन बँड मधील मासिक वेतन ₹८,५६०/-(ग्रेड वेतन वगळून) किंवा अधिक आहे अशा कर्मचाऱ्यांना या प्रयोजनासाठी अग्रिम अनुज्ञेय राहील.

२) वेतन-बँड मधील मासिक वेतनाच्या ३ पट एवढी रक्कम किंवा ₹२५,०००/- किंवा मोपेडची प्रत्यक्ष किंमत यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढा अग्रिम अनुज्ञेय राहील.

३) अग्रिमाची वसूली व्याजासह ३० समान मासिक हप्त्यांमध्ये करण्यात यावी. प्रथम अग्रिम व नंतर व्याज वसूल करण्यात यावे.

(ड) नवीन सायकल खरेदी करण्यासाठी अग्रिमः-

१) ज्या कर्मचाऱ्यांचे ग्रेड वेतन ₹२,८००/- किंवा त्यापेक्षा कमी आहे अशा अराजपत्रित कर्मचाऱ्यांना या प्रयोजनासाठी अग्रिम अनुज्ञेय राहील.

२) ₹३,५००/- किंवा सायकलची प्रत्यक्ष किंमत (विक्रिकर धरुन) यापैकी जी रक्कम कमी असेल तेवढा अग्रिम अनुज्ञेय राहील.

३) अग्रिमाची वसूली व्याजासह १० समान मासिक हप्त्यांमध्ये करण्यात यावी.

(२) उपरोक्त अग्रिम खालील अटींच्या अधीन अनुज्ञेय राहीलः-

(१) अग्रिमासाठी अर्ज करणाऱ्या अधिकाऱ्याची शासनाच्या सेवेतील नियुक्ती संबंधित पदाच्या सेवाभरती नियमानुसार करण्यात आलेली असली पाहिजे आणि अशाप्रकारे करण्यात आलेल्या नियुक्तीनंतर कमीत कमी ५ वर्षांची सलग सेवा झाली असली पाहिजे. तथापि, अस्थिव्यंग अपंग कर्मचाऱ्यांस Scooter with adaption हे उपकरण पुरविण्याबाबत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य

विभागाच्या क्र.अपंग-२०१२/प्र.क्र.३२/अ.क.-२, दि.८ फेब्रुवारी, २०१३ रोजीच्या शासन निर्णयानुसार या उपकरणासाठी ₹५०,०००/- मंजूर करण्यात येतात. त्यावरील येणारा खर्च वाहन अग्रिम म्हणून मंजूर करण्याकरीता खालील अटी शिथिल करण्यात येत आहेत :-

(अ) नियुक्तीनंतर कमीत कमी ५ वर्षांची सलग सेवा झाली असली पाहिजे.

(आ) कर्मचाऱ्यांचे वेतन बँड मधील मासिक वेतन ₹८,५६०/-(ग्रेड वेतन वगळून) असणे आवश्यक आहे.

(२) मोटार सायकल/स्कूटर/मोपेड वाहन चालविण्यासाठी सक्षम प्राधिका-यांकडून, कुटुंबातील एका व्यक्तिला मिळालेल्या अनुज्ञप्तीची (Licence) छायाप्रत सादर करावी लागेल.

(३) वाहनाच्या मॉडेलचे नाव, उत्पादनाचे वर्ष, खरेदीची तारीख व त्या संदर्भाचे नोंदणीचे कागदपत्र सादर करावे लागतील.

(४) मोटार सायकल, स्कूटर, मोपेड, सायकल व अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी स्वयंचलीत तीन चाकी सायकल, स्कूटर विथ अडॅप्शान व मोपेडचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घेणे आवश्यक राहील.

(५) मोटार सायकल, स्कूटर, मोपेड, सायकल व अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी स्वयंचलीत तीन चाकी सायकल, स्कूटर विथ अडॅप्शान व मोपेड शासनाकडे तारण ठेवावी लागेल.

(६) दुचाकी/तीन चाकीसाठी एकदा अग्रिम दिल्यानंतर पुन्हा अग्रिम अनुज्ञेय राहणार नाही. तसेच, सदर शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वी, शासकीय अग्रिम घेऊन खरेदी केलेल्या जुन्या वाहनाऐवजी पुन्हा नवीन वाहन खरेदीसाठी अग्रिम अनुज्ञेय असणार नाही. तथापि, अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या तीन चाकी सायकल खरेदी करिता ही अट शिथील करण्यात येत आहे.

(७) दि.१ मे, २००१ रोजी किंवा त्यानंतर दोनपेक्षा अधिक अपत्ये असणाऱ्या अर्जदारास (दुसऱ्या वेळेस जुळया अपत्यांचा अपवाद वगळता) या अग्रिमाचा लाभ घेता येणार नाही.

(८) शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतनातून होणारी एकूण वजाती त्याच्या मासिक वित्तलब्धीच्या ५०% पेक्षा अधिक असता कामा नये.

(९) सदर अग्रीम मंजूरीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत अग्रिम धारकाने वाहन खरेदी करुन त्यासंबधीची कागदपत्रे शासनास सादर करणे आवश्यक राहील. तसे न केल्यास अग्रिम धारकाकडून अग्रिमाची संपूर्ण रक्कम १ महिन्यानंतर दंडनीय व्याजासह एक रकमी वसूल करण्यात येईल. अग्रिम मंजूर करताना मुंबई वित्तीय नियम-१९५९ मधील नियम १२४(बी) व वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अग्रीम-१०९५/प्र.क्र.७०/९५/विनियम, दि.२६.९.१९९७ मध्ये नमूद तसेच, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार लागू ठरणाऱ्या दंडनीय व्याजाचा उल्लेख मंजूरीच्या आदेशात करण्यात यावा.

(१०) अग्रिमाची रक्कम ज्या महिन्यात वितरीत केली असेल त्याच्या पुढील महिन्यापासून अग्रिमाच्या वसूलीस सुरुवात करण्यात यावी.

(११) वाहन अग्रिम रकमेच्या नियमित वसुलीसाठी तसेच मंजूर अग्रिम रकमेपेक्षा जादा वसुली होत असल्यास त्यास अर्जदार स्वत:ही जबाबदार राहील.

(१२) अग्रिमधारक अनधिकृत रजेवर राहिल्यास अथवा इतर अन्य कोणत्याही कारणास्तव त्याच्या कर्तव्यापासून दूर राहिला तरीही वाहन अग्रिम तसेच शासनाकडील इतर अन्य अग्रिमांची नियमित परतफेड करण्यास संबंधित अग्रिमधारक स्वत: जबाबदार राहील.

(१३) वित्त विभागाने आदेशाव्दारे वेळोवेळी विहीत केल्यानुसार व्याजाचे दर राहतील.

(१४) तसेच, जुनी मोटार सायकल/स्कूटर/मोपेड/ सायकल व अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी जुनी तीन चाकी सायकल खरेदीकरीता अग्रिम मंजूर करण्यात येणार नाही.

(३) वाहन अग्रिम मंजूरीसाठी आवश्यक असलेल्या निधीसाठी प्रत्येक प्रशासकीय विभागाने पुढील लेखाशिर्षाखाली वित्त विभागातील अर्थसंकल्प कक्षाच्या मान्यतेने आवश्यक अर्थसंकल्पिय तरतूद करावी व त्यानंतरच अग्रिम मंजूर करावा.

प्रधान लेखाशीर्ष :- ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे.

गौणशीर्ष :- २०२ , मोटार वाहन खरेदीसाठी अग्रिमे.

(४) मुंबई वित्तीय नियम-१९५९ मधील संबंधित नियम १३६ मध्ये आवश्यक ती सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

(५) हे आदेश शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२०१२०३३५३५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dahiphale Uddhav Rabhaji

Digitally signed by Dahiphale Uddhav Rabhaji
DN: c=IN, o=Government of maharashtra, ou=FD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dahiphale Uddhav Rabhaji
Date: 2014.08.20 12:03:05 +05'30'

**(उ.र.दहिफळे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-(१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०

२. [महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. सर्व विधानमंडळ सदस्य
१०.मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
११.अपर मुख्य सचिव, राज्य निवडणूक आयोग.
१२.मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग
१३.राज्य निवडणूक आयोग.
१४.अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
१९.प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
२०.प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
२१.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
२२.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२३.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
२४.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय मादाम कामा रोड, मुंबई
२५.प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४०० ०५१
२६.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली .
२७.उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन,नवी मुंबई/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
२८. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद / नाशिक/ अमरावती
२९.सर्व उप कोषागार अधिकारी
३०.मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
३१.सर्व विभागीय आयुक्त
३२.सर्व जिल्हाधिकारी
३३.महाराष्ट्र राज्य महिला आयोग, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१
३४.कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक

३५.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३६.सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३७.संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
३८. बहूजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
३९.भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१, योगक्षेम समोर,वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई४०० ०२०,
४०.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही,पटेल रोड, मुंबई-४०० ००४
४१.भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-
४२.इंडियन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेय (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४००००२
४३.नॅशनलस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री पेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.
४४.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,
४५.वित्त विभागातील सर्व कार्यासने
४६.निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग
पत्राव्दारे.